**<u>प्रशासकीय मान्यता</u>**
**तिरोडा, जिल्हा गोंदिया येथील न्यायालयीन इमारतीभोवती (दक्षिण व पश्चिम भाग) संरक्षण भिंत बांधण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीसीबी-१११८/प्र.क्र.१४६/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १ फेब्रुवारी, २०२२.

**<u>पहा :-</u>** मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), मा. उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे क्र.बी (डब्ल्यू) ६०४६/१३७४/२८२५५/१९९४(६), दिनांक २९ ऑक्टोबर, २०२१ चे पत्र.

**<u>प्रस्तावना :-</u>**

तिरोडा, जिल्हा गोंदिया येथील न्यायालयीन इमारतीभोवती (दक्षिण व पश्चिम भाग) संरक्षण भिंत बांधण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्रान्वये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून शासनास सादर करण्यात आला आहे. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

तिरोडा, जिल्हा गोंदिया येथील न्यायालयीन इमारतीभोवती (दक्षिण व पश्चिम भाग) संरक्षण भिंत बांधण्याकरिता रु.४१,७७,६५८/- (रुपये एकेचाळीस लक्ष सत्त्याहत्तर हजार सहाशे अठ्ठावन्न फक्त) इतक्या नमूद केलेल्या विगतवारीनुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | प्रशासकीय मान्यता रूपयात |
|---|---|---|
| १. | भिंतीच्या बांधकामाचा खर्च | ३४,२४,३१०.०० |
| २. | वस्तू व सेवा कर १२% | ४,१०,९१७.०० |
| ३. | भाववाढ ४% | ३,४२,४३१.०० |
| | **एकूण** | **४१,७७,६५८.००** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशाचे विस्तृत नकाशास वास्तु विशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरु करण्यापूर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय, क्र.बीडीजी २०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२ दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त “मागणी क्र.एच-८ ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम (०३) न्यायदान (केंद्र पुरस्कृत योजना-राज्यहिस्सा), (०३) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४०५९०६७२) व (२१) न्यायदान (केंद्र पुरस्कृत योजना-केंद्र हिस्सा), (२१) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४०५९१२२२)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, परिपत्रक, क्र.संकिर्ण-२०१९/ प्र.क्र.१०/ इमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये मा. मुख्य अभियंता, नागपूर यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यते- नुसार तसेच, नियोजन विभाग, परिपत्रक, क्र.ससमा-२०१०/ प्र.क्र.४८/भाग-१/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/विनियम,भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०२०११६५९०७१६१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.02.01 17:00:16 +05'30'

**(नितिन वि. जिवने)**
**विधि सल्लागार नि सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.विरोधीपक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
५) मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
६) मा.प्रबंधक, निरीक्षणे-२,बीडब्ल्यू शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई.
७) मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, गोंदीया
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन, मुंबई व नागपूर,
९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
१०) कार्यकारी अभियंता (सार्वजनिक बांधकाम विभाग), गोंदिया (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११) जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१४) नियोजन विभाग-१४४३, मंत्रालय, मुंबई-४००००३२,
१५) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ,-१८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन ,मंत्रालयासमोर, मुंबई.४०००३२-
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७) कक्ष अधिकारी, का- ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४००, ०३२.
१८) निवडनस्ती/संग्रहार्थ.